केंद्र शासनाच्या " स्वच्छ भारत मिशन ( ग्रामीण )" कार्यक्रमांतर्गत निधी वितरीत करण्याबाबत.
**( २२१५ ९८६२ )**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः- बीयुडी-२०१८/ प्र.क्र. ०६/ कार्यासन ६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: २० नोव्हेंबर,२०१८

<u>वाचा -</u>

१) शासन परिपत्रक,वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१८ /प्र.क्र.६९ / अर्थ-३, दि. ०२/०४/२०१८.
२) केंद्र शासन, पेय जल व स्वच्छता मंत्रालय यांचे क्र.एस.१८०१३/२/२०१४-डीआयआर(एसबीएम)-भाग(१), दि.१४/०३/२०१८.
३) शासन निर्णय,आदिवासी विकास विभाग समक्रमांक दि.२९/०८/२०१८
४) पाणीपुरवठा व स्वच्छता विभागाची नस्ती क्र.स्वभामि- २०१८ / प्र.क्र.४९७ /पा.पु.१६.

**शासन निर्णय : -**

केंद्र पुरस्कृत " स्वच्छ भारत मिशन ( ग्रामीण )" कार्यक्रमासाठी आदिवासी उपयोजनांतर्गत मागणी क्र.टी-५, २२१५- पाणी पुरवठा व स्वच्छता, जनजाती क्षेत्र उपयोजना, जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना, (०२) मलप्रणाल व स्वच्छता, ७९६, जनजाति क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाति क्षेत्र उपयोजना, (०१) (०३) स्वच्छ भारत अभियानांतर्गत वैयक्तिक स्वच्छालय बांधणे (केंद्रिय) (कार्यक्रम), (२२१५ ९८६२) ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर), या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता रु. ४७२२५.७१ लाख इतका निधी अर्थसंकल्पित आहे. सदर निधीपैकी रु. १८९८७.२४ लाख इतका निधी वाचा क्र. ३ येथे नमूद शासन निर्णयान्वये पाणी पुरवठा व स्वच्छता विभागास वितरीत करण्यात आलेला आहे.

२. केंद्र शासनाने वाचा क्र. २ येथील पत्रान्वये उपरोक्त योजनेंतर्गत सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरीता रु.८२८.०० लाख इतका निधी उपलब्ध करुन दिलेला आहे. यानुषंगाने पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने वाचा क्र. ४ येथील नस्तीवर प्रस्तावित केल्यानुसार स्वच्छ भारत मिशन ( ग्रामीण ) कार्यक्रमांतर्गत (२२१५ ९८६२), ३१- सहायक अनुदाने (वेतनेत्तर), या लेखाशिर्षाखाली रु. ८२८.०० लाख (अक्षरी रुपये आठ कोटी अठ्ठावीस लाख फक्त ) इतका निधी प्रशासकिय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांना खर्चासाठी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरित करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

३. संबंधित नियंत्रण अधिकारी / विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्ट्ये इ. माहिती, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; आदिवासी विकास विभाग व पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

४. नियंत्रक अधिकारी/ विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात व आदिवासी घटक कार्यक्रम क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लाभार्थ्यांकरिता व आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तथापि आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेर केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी वैयक्तिक लाभार्थ्यांकरिताच खर्च करण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय सदर शासन निर्णय वित्त विभागाने **वाचा** येथील क्रमांक १ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१५५/अर्थोपाय, दि.२९/०३/२०१८ व अनौपचारिक संदर्भ क्र.२५२/२०१८/व्यय-३, दि.२५/०९/२०१८ अन्वये केंद्र शासनाच्या मान्यतेच्या (Revalidation) अटीच्या अधिन राहून दिलेल्या सहमतीस अनुलक्षुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२०१५१७५८९१२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarrao Aute

Digitally signed by Ravindra Digambarrao Aute
DN: cn=Ravindra Digambarrao Aute, o=Tribal Development Department, ou=Government of Maharashtra, email=rajendra.aute@nic.in, c=IN
Date: 2018.11.20 18:10:32 +05'30'

( रविंद्र औटे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय, मुंबई
२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
३. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग.
४. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
५. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. विभागीय आयुक्त, मुंबई / नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती/ पुणे.
७. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
०९. वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, (पापु-१६ ) मंत्रालय, मुंबई
११. कक्ष अधिकारी (कार्या.-१७), / निवड नस्ती (कार्या ६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई